**राज्य कामगार विमा योजना, सेवा दवाखाना, बगडगंज, नागपूर या सेवा दवाखान्यांच्या संरक्षक भिंतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक : राकावि-२०१४/प्र.क्र.३३८/१४(१)/राकावि-२**

गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : ०३जुलै,२०२३.

**वाचा -**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.राकायो-२०१८/प्र.क्र.१४५/राकावि-२, दिनांक ०५ मे, २०१८.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.राकायो-२०१४/प्र.क्र.३३८/१४/राकावि-२, दिनांक २० ऑगस्ट, २०१८.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दिनांक २० सप्टेंबर, २०१९.
४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक १९ सप्टेंबर, २०१९.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कामगार विमा सोसायटी, मुंबई यांचे पत्र क्र.मुकाअ/मराकाविसो/का.क्र.९/बगडगंज व पाचपावली/कुंपण भिंत /५१७३-७६/२०२२, दिनांक १५ मार्च, २०२२.

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने सन २०१० मध्ये राज्य कामगार विमा अधिनियम १९४८ मध्ये सुधारणा केली असून त्यातील कलम ५८(५) नुसार राज्याकरीता राज्यस्तरीय राज्य कामगार विमा महामंडळ स्थापन करण्याची तरतुद विहित केलेली आहे. या तरतूदीच्या अनुषंगाने स्वतंत्र राज्यस्तरीय महामंडळाची स्थापना दिनांक २१.०६.२०१६ च्या शासन निर्णयाद्वारे करण्यात आलेली होती. तथापि, राज्य कामगार विमा महामंडळाच्या दिनांक ०६.१२.२०१७ व दिनांक १६.०२.२०१८ रोजी संपन्न झालेल्या १७२ व १७३ क्रमांकाच्या बैठकीमध्ये राज्य कामगार विमा योजनेकरीता सोसायटी स्थापन करण्याबाबत मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सोसायटी स्थापन झाल्यास राज्य कामगार विमा महामंडळाकडून येणारी रक्कम थेट सोसायटीत जमा होईल आणि महत्वाचे

जलदगतीने घेण्यात येऊन विमा लाभार्थ्यांना वैद्यकीय सुविधा अधिक सुलभतेने व परिणामकारकरीत्या पुरविता येतील. त्यामुळे राज्यस्तरीय राज्य कामगार विमा महामंडळाची स्थापना रद्द करुन त्याऐवजी महाराष्ट्र राज्य कामगार विमा सोसायटी दिनांक ०५.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आली आहे. राकावि योजना लागू झालेल्या या नवीन क्षेत्रात महा-राकावि सोसायटीमार्फत नोंदणीकृत विमाधारक व लाभार्थींना primary व secondary medical care पुरविण्यात येते. Primary medical care अंतर्गत महा-राकावि सोसायटीच्या अधिनस्थ सेवा दवाखाने दवाखाने सुरु करण्यात आलेले असुन, secondary medical care अंतर्गत राकावि रूग्णालये सुरु करण्यात आलेली असुन त्यामार्फत नोंदणीकृत विमाधारक व लाभार्थींना वैद्यकीय सेवा पुरविण्यात येत आहेत.

राज्य कामगार विमा योजना सेवा दवाखाना, बगडगंज, नागपूर या सेवा दवाखान्यांच्या इमारतींचे बांधकाम पूर्ण झालेले असून तेथील भुखंडावर अतिक्रमण होऊ नये व इमारत बांधकामाचे क्षेत्र संरक्षित करण्याच्या दृष्टीने, त्या ठिकाणी संरक्षक भिंतीचे बांधकाम करण्याबाबत यापूर्वी संदर्भीय दिनांक २०.०८.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. परंतु, अंदाजपत्रकीय दरात वाढ झाल्याने व प्रमानुसार प्रत्यक्षात काम सुरु न झाल्याने आयुक्त, मुख्य कार्यकारी अधिकारी, महा-राकावि सोसायटी, मुंबई यांनी संदर्भीय दिनांक १५.०३.२०२२ च्या पत्रान्वये सविस्तर अंदाजपत्रकासह सादर केलेल्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

बगडगंज, नागपूर येथील सेवा दवाखान्याकरीता संरक्षक भिंत बांधण्यासाठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी दिलेल्या तांत्रिक सहमतीनुसार खालील सविस्तर अंदाजपत्रकीय गोषवाऱ्यानुसार रु.९९,७२,०३५/- (अक्षरी रुपये नव्यान्नव लक्ष बहात्तर हजार पस्तीस फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| RECAPULATION SHEET | | |
|---|---|---|
| **Sr.No** | **Description** | **Amount** |
| 1 | Construction of Compound Wall(as per detailed abstractA) | 7691695.00 |
| 2 | Royalty+ Testing Charges (as per detailed abstract-B) | 40776.00 |
| **A** | Total | 7732471.00 |
| (i) | Add for G.S.T. charges on work cost 12% | 927897.00 |
| (ii) | Add for Labour Insurance 1% | 77325.00 |
| (iii) | Add for Centage on work cost 5% | 386624.00 |
| (iv) | Add for Contingencies charges on work cost 4% | 309299.00 |
| (v) | Add for External Electrical charges on work cost 7% | 538419.00 |
| **B** | Total | 2239564.00 |
| | **Grand Total** | **9972035.00** |

२. सदरहू प्रशासकीय मान्यता पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

(१) प्रस्तुत काम सुरु करण्यापुर्वी मुख्य अभियंता, सा.बां.वि., नागपूर यांची सविस्तर अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूर घ्यावी. तसेच प्रस्तुत कामी संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणाची मान्यता घेण्यात यावी.

(२) प्रस्तुत कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीत तसेच विहीत मुदतीत काम पुर्ण करुन घेण्याची संबंधित कार्यकारी अभियंता, सां.बां.विभाग यांनी विशेष दक्षता घ्यावी.

(३) प्रत्यक्ष काम हाती घेतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७/तां.क.१/ दिनांक १०.०१.२०१४ मधील उल्लेख केलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करावी.

३. या कामी होणारा खर्च, "मागणी क्र.आर-१, सार्वजनिक आरोग्य विभाग, २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१- नागरी आरोग्य सेवा (विषम चिकित्सा), १०२-राज्य कामगार विमा योजना, १०२-(१)-बृहन्मुंबईतील व मुफसल क्षेत्रातील राज्य कामगार विमा योजना, (०१) (०२)-वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना (२२१० १३८५), २७-लहान बांधकामे." या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र. तीन, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७०३१७३३४२३२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2023.07.05 14:49:21 +05'30'

**( चंद्रकांत ह. वडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, महा-राकावि सोसायटी, मुंबई.

२. संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
३. वैद्यकीय प्रशासन अधिकारी, राज्य कामगार विमा योजना, नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय, नागपूर.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर.
७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नागपूर.
८. कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (एम), सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
९. वित्त विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (राकावि-२)